शंकररावजी चव्हाण विष्णुपुरी प्रकल्प ता. व जि. नांदेड अंतर्गत गोदावरी नदीवरील राजा टाकळी उच्च पातळी बंधारा ता. घनसावंगी जि. जालना अंतर्गत उभे उचलद्वारे व इतर अनुषंगिक घटक भागांच्या विशेष दुरुस्ती कामास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.

महाराष्ट्र शासन

जलसंपदा विभाग,

शासन निर्णय क्रमांक : प्रमाप्र २०१९ /(प्र.क्र. ३४७/ २०१९)/( सिंव्य/कामे)

मंत्रालय मुंबई ४०० ०३२

दिनांक : ३१ ऑगस्ट, २०२०

वाचा-

१. कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद यांचे पत्र क्र. गोमपाविम/तां-१/विवसु-कडा/औरंगाबाद/धा.क्र.६/१११३० दि.१५/११/२०१९
२. शासन निर्णय-२०१७/५६६/१७/सिंव्य(कामे),दि.३१/०८/२०१८
३. शासन निर्णय-संकीर्ण-२०१८/प्र.क्र.५५१/१७/सिंव्य(कामे), दि.२७/११/२०१८
४. शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०१६/२७/२०१६/लपा-०२,दि.२६/०५/२०१७
५. शासन निर्णय क्र.प्रमा-२०१३/(प्र.क्र.७८५/१३)/सिंव्य (कामे), दि.०१/०८/२०१९
६. वित्त विभाग शा. नि. क्र. अर्थसं-२०२०/प्र. क्र. ६५/अर्थ-३ दि. ०४.०५.२०२०

प्रस्तावना

शंकररावजी चव्हाण विष्णुपुरी प्रकल्प, ता. व जि.नांदेड अंतर्गत गोदावरी नदीवरील राजा टाकळी उच्च पातळी बंधारा ता. घनसावंगी, जि. जालना हा बंधारा जायकवाडी प्रकल्पाच्या खालील बाजूस असून मुक्त पाणलोट क्षेत्र ३५२.२० चौ.कि.मी आहे. प्रकल्पाचा एकुण प्रकल्पिय पाणीसाठा २५.०० दलघमी असून सिंचन क्षमता ३०४४ हेक्टर आहे. राजा टाकळी उच्च पातळी बंधाऱ्यास १५ मी.× ५ मी. आकाराची १६ उभी उचलव्दारे, १५ मी.× १.३ मी. आकाराची ८ थोपव्दारे व २५ मे.टन क्षमतेची एक गोलियथ क्रेन आहे.

या योजनेव्दारे जालना जिल्हयातील शिवनगांव, उक्कडगांव, राजा टाकळी, मंगरुळ, मुद्रेगांव,राजुरकर कोठा व बीड जिल्हयातील तपेनिमगांव, रामपुरी, गोपत पिंपळगांव, ढालेगांव, श्रीपत अंतरवाला, शेलगांव, मनुबाई जवळा या गावातील एकुण ३०४४ हेक्टर क्षेत्र सिंचनाखाली येणार असुन २.९४ दलघमी पाणी पिण्यासाठी राखीव ठेवण्यात आलेले आहे.

मुख्य बंधाऱ्याची स्थापत्य,यांत्रिकी व विद्युत कामे पूर्ण झाली असून जून -२००९ अखेर प्रकल्पिय पाणीसाठा व सिंचन क्षमता निर्मिती पूर्ण झाली आहे. प्रकल्प जून- २०१८ मध्ये सिंचन व्यवस्थापन विभागास हस्तांतरीत झालेला आहे.

अधीक्षक अभियंता, यांत्रिकी मंडळ,नांदेड यांनी राजा टाकळी बंधाऱ्यावरील उभी उचलव्दारांच्या अनुषंगिक घटकभागांचे दुरूस्ती करण्याच्या सुचना दिलेल्या आहेत.तसेच वेळोवेळी यांत्रिकी व स्थापत्य अभियंता यांनी प्रकल्प भेटीच्या दरम्यांन दुरूस्ती कामे करून घेण्याबाबत सुचना दिलेल्या आहेत.

राजा टाकळी उच्च पातळी बंधाऱ्याचे दि. ०५.०६.२०१९ रोजी उप अभियंता (यां) निरीक्षण उपविभाग क्र. २, औरंगाबाद, यांनी पावसाळा पूर्व निरीक्षण करून त्याबाबतचा अहवाल दि. ०१.०७.२०१९ रोजीच्या पत्रान्वये कार्यकारी अभियंता (यां), निरीक्षण पथक, औरंगाबाद यांना सादर केलेले आहे. त्याअनुषंगाने कार्यकारी अभियंता (यां), निरीक्षण पथक, औरंगाबाद यांनी दि. १५.०७.२०१९ रोजीच्या पत्रान्वये सदर पावसाळा पूर्व -२०१९ चा निरीक्षण अहवाल कार्यकारी अभियंता जायकवाडी पाटबंधारे विभाग, औरंगाबाद यांचेकडे पाठविला आहे. या पर्जन्यपूर्व -२०१९ निरीक्षण अहवालाप्रमाणे राजा टाकळी उच्च पातळी बंधाऱ्यात एकुन ८६ त्रुटी आढळलेल्या आहेत.

अधीक्षक अभियंता, यांत्रिकी मंडळ, नांदेड यांचेकडील तांत्रिक टिप्पणी, व त्यावरील स्थापत्य विभागाचे अभिप्राय, स्थापत्य विभागास व्दारांचे परिचालन करताना येणाऱ्या अडचणी, पर्जन्यपूर्व निरिक्षण अहवाल २०१९ मधील त्रुटी यांचा एकत्रित व सारासार विचार करता बंधाऱ्यांच्या सुरक्षिततेच्या दृष्टीने व बंधाऱ्यांच्या व्दारांचे सुलभ परिचालन होण्याच्या दृष्टीने राजा टाकळी उच्च पातळी बंधाऱ्यांतील उभ्या उचलव्दारांच्या व इतर अनुषंगिक घटकांच्या विशेष दुरुस्ती कामास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्याअनुषंगाने शासन खालीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**<u>शासन निर्णय</u>**

राजा टाकळी उच्च पातळी बंधारा ता. घनसावंगी, जि. जालना अंतर्गत उभे उचलद्वारे व इतर अनुषंगिक घटक भागांच्या विशेष दुरुस्ती कामास विस्तार व सुधारणा लेखाशिर्षाअंतर्गत रु.१,४४,५८,२२८/- १% विमा रु. १,४४,५८२/- १% अनुषंगिक खर्च रु. १,४४,५८२/- १२% GST रु. १७,६९,६८७/- अशा एकुण रु. १,६५,१७,०८०/-( रु. एक कोटी पासष्ट लाख सतरा हजार ऐंशी) एवढ्या खर्चाच्या प्रस्तावास खालील अटींच्या राहुन प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

१. शासन परिपत्रक क्र.प्रमा-२०१३/(७८५/१३)/सिं.व्य.(कामे), ०१.०१.२०१५ मधील मार्गदर्शक सूचनांचे पालन करणे अभिलेखे ठेवणे व कार्यवाही करणे महामंडळावर बंधनकारक आहे.

२. शासन परिपत्रक क्र. बैठक ०११९- (प्र.क्र. १३९/२०१९) यांत्रिकी, दि १६.१२.२०१९ मधील मार्गदर्शक सूचनांचे काटेकोरपणे पालन करणे बंधनकारक आहे.

३. शासन पत्र दि.०४/०६/२०१६ अन्वये तपासणी सूचीतील मुद्दे आर्थिक निकष मा. राज्यपाल यांच्या निर्देशानुसारनिधी खर्च करणे, दायित्व निर्मिती मर्यादेत राहण्यासाठी कामाचे योग्य नियोजन करणे याची संपूर्ण जबाबदारी महामंडळाची राहील.

४. तांत्रिक मान्यतेपूर्वी बांधकामाचे सविस्तर सर्वेक्षण व संकल्पनावर आधारित तरतूद करण्याची संपूर्ण जबाबदारी महामंडळाची राहील.

५. अंदाजपत्रकात गृहीत धरलेले आराखडे / संकल्पने दरसूची बाह्यबाबी व वहन अंतरे तपासून अंदाजपत्रकास सक्षमस्तरावर तांत्रिक मान्यता प्रदान करावी.

६. कामाचा खर्च उपलब्ध अनुदानातून प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेत व नियोजित वेळेत पूर्ण करण्यात यावा. सदरची कामे पूर्ण होईपर्यंत त्रैमासिक प्रगती अहवाल शासनास सादर करावा. काम पूर्ण झाल्यानंतर त्याबाबतचा पूर्णत्व अहवाल शासनास त्वरीत सादर करावा.

७. विषयांकित प्रशासकीय मान्यता अंदाजपत्रकातील तरतूदी, दर , वहनअंतर ,संकल्पन व इतर तांत्रिक निकष याबाबतची संपूर्ण जबाबदारी क्षेत्रिय मुख्य अभियंता(यां) व अधीक्षक अभियंता(यां) यांची राहील.

८. सदर प्र.मा. अंदाजपत्रकातील कामांसाठी कोणत्याही प्रयोजनार्थ मंजूर प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेबाहेर जाऊन, निधी वितरण अथवा अतिरिक्त खर्च करता येणार नाही. तसेच प्रस्तावास प्रशासकीय मान्यतेची मंजूरी दिल्या नंतर पुन्हा सुधारीत प्रशासकीय मान्यता देता येणार नाही . या संदर्भात प्रचलित शासन निर्णय, CWC ची मार्गदर्शक तत्वे, वित्तीय अधिकार मर्यादा, विहित केलेली निविदा कार्यपध्दत याची काटेकोरपणे अंमलबजावणी करण्यात यावी.

प्रस्तावित कामावर होणारा खर्च ४७०१ मोठे व मध्यम पाटबंधारे यावरील भांडवली खर्च,८०-सर्वसाधारण, १९०-सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणूका, (१०)- विविध पाटबंधारे विकास महामंडळाना भाग भांडवली अंशदान (विस्तार व सुधारणा), (१०)(०२) गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळास भागभांडवली अंशदान (मराठवाडा विभाग) (कार्यक्रम) (४७०१ जे १४९) ५४ गुंतवणुका या मुख्य लेखाशिर्षखालीकरावा व मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०१६/२७/२०१६/लपा-०२, दि.२६/०५/२०१७ अन्वये विशेष दुरुस्ती कामास आंतरवित्त सल्लागार यांचे सहमतीने मान्यता देण्याबाबतचे अधिकार जलसंपदा विभागास आहेत. त्याअनुषंगाने आंतरवित्तीय सल्लागार व सहसचिव यांच्या सहमतीने, हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे. या कामास प्रदान करण्यात आलेली प्रशासकीय मान्यता सिं.व्य (कामे) कार्यासनाच्या नोंदवही सन २०२०-२१ मध्ये अ.क्र. ५ वर नोंदविण्यात आलेली आहे.

९. वित्त विभाग शासन निर्णय दि.०४.०५.२०२० मधील प्रशासकिय मान्यतेबाबतचे निर्बंध शिथिल करण्यास वित्त विभागाने जलसंपदा विभाग सिंव्य /कामे धारिका क्र.संकिर्ण २०२० /(१६७/२०२०) सिंव्य (कामे) मध्ये दिलेल्या मान्यतेच्या अनुषंगाने सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००८३११७३९५८५२२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rohit Ramesh Pol

Digitally signed by Rohit Ramesh Pol
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=a3f5da1c64ed29bf6db18523c96c72afc205d05e28b96b16e6cd2bb2d57dc30e,
serialNumber=d72af533bf2c602d70d98df7b8a1878e186f7ea2276bae5e65ea1ad0b9614373, cn=Rohit Ramesh Pol
Date: 2020.08.31 17:40:53 +05'30'

**(रो.र.पोळ)**
**शासनाचे अवर सचिव**

**प्रत:-**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव,
२. मा.मुख्यमंत्री यांचे कार्यालय,
३. मा.उप मुख्यमंत्री यांचे कार्यालय,
४. मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष,विधानसभा,विधानभवन,मुंबई,
५. मा.सभापती/उपसभापती,विधानपरिषद, विधानभवन,मुंबई,
६. मा.विरोधी पक्षनेते, विधानसभा, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन,मुंबई,
७. मा.विरोधी पक्षनेते, विधानसभा, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन,मुंबई,
८. मा.मंत्री, जलसंपदा यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
९. मा.राज्यमंत्री, जलसंपदा यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई,
१०. प्रधान सचिव (जलसंपदा) यांचे स्वीय सहायक, जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई,
११. सचिव (जसंव्य व लाक्षेवि) यांचे स्वीय सहायक, जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई,
१२. सचिव (प्रकल्प समन्वय) यांचे स्वीय सहायक, जलसंपदा विभाग, मंत्रालय,मुंबई,
१३. महालेखापाल-१ (लेखा व अनूज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई,
१४. महालेखापाल-२ (लेखा व अनूज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य,नागपूर,
१५. कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद,
१६. आंतरवित्त सल्लागार व सहसचिव, जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई,
१७. मुख्य अभियंता व मुख्य प्रशासक, लाभ लाभक्षेत्र विकास, जलसंपदा विभाग, औरंगाबाद,
१८. मुख्य अभियंता (यांत्रिकी), जलसंपदा विभाग, नाशिक,
१९. उपसचिव (मोप्र -२), जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई.
२०. उपसचिव (सिव्य), जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई.